राज्य उत्पादन शुल्क विभागातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र. इएसटी-१७१७/ प्र.क्र.४४/ राउशु-१,**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

दिनांक : १९ ऑक्टोबर, २०१९.

**वाचा :**

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र. इएसटी २००२/प्र.क्र.९६/इएक्ससी-४, दि.०१.०१.२००३.

२) शासन निर्णय, गृह विभाग क्र. इएसटी-१७१७/प्र.क्र.४४/राउशु-१, दि.२९.०३.२०१९.

३) वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/ प्र.क्र. ८/ १६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९.

**शासन निर्णय :**

राज्य उत्पादन शुल्क विभागाचा आकृतीबंध संदर्भाधीन दि.०१.०१.२००३ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेला आहे. त्यानुसार राज्य उत्पादन शुल्क विभागासाठी मंजूर करण्यात आलेल्या एकूण ३६०६ पदांपैकी १२२६ पदे अस्थायी आहेत.

२. विभागाच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना संदर्भाधीन दि.२९.०३.२०१९ च्या शासन निर्णयान्वये दि.३०.०९.२०१९ पर्यंत मुदतवाढ दिलेली होती. सदर १२२६ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.११.०९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९१०१९११४१५२०१२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji Baburao Chavan

Digitally signed by Shivaji Baburao Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9aa522e32450ec03b47343bc963097b0e134f043fb205f2e97595f145aaf4d73, serialNumber=b5ccfce8750c2a4b31ad76a42c0094dcbcc63834c3279619496c6858859c8594, cn=Shivaji Baburao Chavan
Date: 2019.10.19 11:44:33 +05'30'

**( शिवाजी बा. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,

३) सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,

४) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.

५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

७) सह संचालक (लेखा), राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी .

९) निवडनस्ती राउशु-१

********